आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत,सन २०१९-२० या वर्षाकरीता "राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम " करीता निधी वितरीत करण्याबाबत..
केंद्रहिस्सा (लेखाशिर्ष-२२१५ ९८५३ ).

महाराष्ट्र शासन.
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र. क्र.१०/ कार्यासन.६.
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ०६ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. W-११०२०/१९७/२०१५- Water-I /३२, दिनांक २५.११.२०१९.
४) पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.जेजेएम- २०१९ / प्र.क्र. १५९ /पापु.-१०.

**शासन निर्णय-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, जनजाती क्षेत्र उपयोजना, जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना, (०१) पाणीपुरवठा, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) (०९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( केंद्रीय हिस्सा) (२२१५ ९८५३), ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर), या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या वर्षात रु. २००००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. केंद्र शासनाने आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या योजनेकरिता सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी रु. ५०५१.६४ लाख इतका निधी वाचा क्र. ३ येथील पत्रान्वये वितरीत केलेला आहे. त्यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वाचा क्र.४ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार (०१) (०९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम ( केंद्रीय हिस्सा) (२२१५ ९८५३) ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर ) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात रु. ५०५१.६४ लाख (अक्षरी रुपये पन्नास कोटी एक्कावन लाख चौसष्ट हजार फक्त ) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला

जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तथापि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तिक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३१/अर्थोपाय, दि.५/१२/२०१९ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०६१२११४७२५२४असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.02.06 13:25:13 +05'30'

( किरण कि. पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (पापु-१० ) मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी(का.-१७)/ निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.